क्रमांक-आरएमआर-२००९/प्र.क्र.२६-ब/रस्ते-१

सार्वजनिक बांधकाम विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १५/१२/२००९.

प्रति,

मुख्य अभियंता,
सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
पुणे.

**विषय** रस्ते व पुलांच्या विशेष देखभाल दुरुस्ती कार्यक्रमासाठी गट (ब) आणि गट (क) वरील कामांच्या सन २००९-१० साठीच्या कार्यक्रमाच्या मंजुरीबाबत.
(जिल्हा-सातारा, क्षेत्र-स्थानिकक्षेत्र)

**संदर्भ** १) शासन पत्र क्र.आरएमआर-२००२/प्र.क्र.१०९/रस्ते-१, दि.०४/०६/२००२.
२) आपले क्र.का-२/रस्ते/कोल्हापूर/६६०७/२००९, दिनांक २८/१०/२००९ चे पत्र.

सन २००९-१० मध्ये सातारा जिल्हा स्थानिकक्षेत्रासाठी रस्ते व पुलांच्या विशेष देखभाल दुरुस्ती कार्यक्रमातील दायित्वाच्या रु.१३९६.२५ लक्ष इतक्या किंमतीच्या कार्यक्रमास सोबतच्या तक्त्यामधील जॉब क्रमांकाद्वारे मंजुरी देण्यात येत असून ही मंजुरी खालील अटींचे पूर्णतः अनुपालन होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. **कार्यक्रमास प्रदान केलेली मंजुरी ही संवर्गनिहाय, कामनिहाय व किंमतप्रधान आहे.** शक्यतो मंजूर किंमतीच्या ८५ टक्के ते ९० टक्के एवढ्याच रकमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरी द्यावी, म्हणजे अंतिम खर्च हा मंजूर किंमतीच्या मर्यादेतच राहील.
२. कार्यक्रमातील मंजूर कामांना मंजूर रकमेपेक्षा जास्त खर्च संभवत असल्यास त्याच्या कारणासह अहवाल शासनास सादर करून जास्त होणारा खर्च भागविण्या संबंधीचा पुर्नविनियोजन प्रस्ताव शासनाने मंजूर करे पर्यंत त्या कामांसाठी कार्यक्रम निहाय नमूद केलेल्या मंजूर किंमतीपेक्षा जास्त रकमेची देयके अदा करू नयेत.
३. पूर्ण झालेल्या आणि प्रगतीत असणाऱ्या कामांचे **उत्तरदायित्व निपटण्यासाठी उपलब्ध निधी प्राथम्याने खर्च करावा.**
४. या कार्यक्रमानुसार **सध्या प्रगतीत असणारी कामे दिनांक ३१-३-२०१० पूर्वी पूर्ण करण्याचे नियोजन ठेवावे.**
५. सन २०१०-२०११ चा कार्यक्रम सादर करताना त्यावेळी जी कामे (प्रगतीत) अशी दर्शविली जातील त्यांच्या नावापुढे या कार्यक्रमातील मंजुरीप्रमाणे जॉब क्रमांक नमूद करावेत.

६. गट अ,ब,क आणि ड यामध्ये अंतर्गत पुनर्विनियोजन आवश्यक असल्यास तसे प्रस्ताव दिनांक ४-६-२००२ च्या शासन पत्रासोबतच्या तपशीलवार सूचनांच्या परि.१.८ नुसार शासनास सादर करावेत.

७. **नव्या कामांच्या निविदा निश्चितीची कार्यवाही एका विभागासाठी एकाच निविदा सूचनेमध्ये सर्व कामांच्या निविदा बोलावून करण्यात यावी.**

८. तपशीलवार कार्यक्रम पुस्तिकेच्या शासनाकडील प्रतीवरील जॉब क्रमांक आपल्याकडील प्रतीवर नमूद करावे.

९. गोषवाऱ्यात नमूद केलेली संवर्गनिहाय कामांची संख्या व किंमत ही तपशीलवार कार्यक्रम पुस्तिकेनुसार बरोबर आहे किंवा कसे हे पडताळून पहावे. काही फरक असल्यास असा फरक कृपया शासनाच्या निदर्शनास आणावा.

१०. वरील अनु. क्रमांक २,३,४,५,६ व ७ चे काटेकोरपणे पालन करावे. त्यात विचलन झाल्यास संबंधितांच्या गोपनीय अहवालात नोंद घेऊन कडक कारवाई करण्यात येईल.

११. सन २००९-१० साठी निधी प्राप्त झाल्याशिवाय कामे सुरू करण्यात येऊ नयेत.

१२. प्रस्तावातील कामे अन्य योजनेत समाविष्ट नाहीत याची खातरजमा तांत्रिक मंजूरी देण्यापूर्वी अ.अ./का.अ. यांनी करावी. काही कामे दुस-या योजनेतून किंवा कार्यक्रमातून मंजूर आहेत असे आढळल्यास शासनास तात्काळ कळवून मंजूर जॉब क्रमांक रद्द करुन घेणेची जबाबदारी देण्यापूर्वी अ.अ. यांनी करावी.

१३. सदर पत्र महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२१५१९१०००००१ असा आहे.

( मिलिंद वानखेडे )
अवर सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन

प्रत सहपत्रासह,

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.

प्रत,

कार्यासन अधिकारी, अर्थ-१, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.